नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात अधिसुचित विशिष्ट नागरी सेवा व सुविधा पुरविण्यासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(५)/का-१४११,**
मंत्रालय, मुंबई४००- ०३२
दिनांक :- १३ मार्च, २०२४

वाचा :- १) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३३/का-१४११, दि.२८ मार्च, २०२२,
२) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.२९ मार्च, २०२२,
३) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२१/प्र.क्र.३६/का-१४११, दि.७ जुलै, २०२२,
४) शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :-**

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करण्यासाठी “महानगरपालिका क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे” व “नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत क्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे” या योजनांना वाचा येथील अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून त्याअंतर्गत करावयाच्या कामांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. (२.४), ३, ४ व ७ येथील तरतुदींमध्ये वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली होती. तथापि, वाचा येथे नमूद अनुक्रमांक (३) येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेल्या सुधारणा रद्द करुन वाचा येथे नमूद अनुक्रमांक (१) येथील शासन निर्णयामधील तरतूदी वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयान्वये पुन:स्थापित करण्यात आल्या आहेत. वाचा येथे नमूद अनुक्रमांक (४) येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन सोबत जोडलेल्या यादीतील विकास कामांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या परिक्षेत्रात नागरी सेवा व सुविधेची कामे करणे (नगरपालिकानगरपंचायत/नगरपरिषद/) " या योजनेअंतर्गत शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार कागल व गडहिंग्लज नगरपरिषद अंतर्गत सोबत दिलेल्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या रू. १५.०० कोटी एवढ्या किंमतीच्या कामांची थेट शासन स्तरावरून निवड करण्यात आली आहे. सदर कामांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा कागल व गडहिंग्लज नगरपरिषद राहतील.

२. शासन निर्णय, नियोजन विभाग दिनांक २८ मार्च, २०२२ मधील परिच्छेद ३(ब) नुसार उपरोक्त कामांना संबंधित कार्यान्वयीन यंत्रणा यांनी तांत्रिक मान्यता व जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची कार्यवाही करावी. प्रशासकीय मान्यता परिशिष्टातील रकमेच्या मर्यादेत असल्याची दक्षता जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी घ्यावी.

३. शासन निर्णय नियोजन विभाग क्र. संकिर्ण-२०२३/प्र.क्र.५९/का-१४११, दि.२२ नोव्हेंबर, २०२३ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार सोबतच्या परिशिष्टातील कामांसाठी प्राप्त होणारे अनुदान वितरीत करण्याकरिता जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांच्या नावे स्वतंत्र बँक खाते उघडण्यात यावे. बँक खात्याचा तपशील (IFSC कोड व खाते क्रमांक) नियोजन विभागास सादर करावा. त्यानंतर सदर निधी उक्त बँक खात्यामध्ये सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कामांसाठी जिल्हाधिकारी, कोल्हापूर/कागल व गडहिंग्लज नगरपरिषद यांनी संदर्भ क्र. (१) व (४) येथील शासन निर्णयामधील अन्य सर्व अटी व शर्तीचे पालन करणे बंधनकारक राहील.

५. या कामांसाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.ओ-९, ३६०४, स्थानिक संस्था व पंचायतराज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकीत रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाई व अभिहस्तांकन,(०१)(०२), नागरी स्थानिक संस्थांना (नगरपालिका/नगरपरिषद/नगरपंचायत) सहायक अनुदान (३६०४ १०१८) (कार्यक्रम), ३१,सहायक अनुदान" या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ करिता उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१८४९३५५२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc8077686 47a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0C F60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2024.03.13 18:58:57 +05'30'

**(चारुशीला चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त पुणे विभाग,
२. जिल्हाधिकारी, कोल्हापूर,
३. मुख्य अधिकारी, कागल/ गडहिंग्लज नगरपरिषद,
४. जिल्हा नियोजन अधिकारी, कोल्हापूर,
५. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदयांचे उप सचिव,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
९. सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर,
१०. वित्त विभाग, व्यय-८/कोषा प्रशासन-५/अर्थसंकल्प-१६, मंत्रालय, मुंबई,
११. निवड नस्ती (का-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

| | **शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८(५)/का-१४११, दि.१३ मार्च, २०२४ सोबतचे परिशिष्ट** | |
|---|---|---|
| **अ. क्र.** | **कामाचे नाव** | **रक्कम रु. कोटी** |
| | **कागल नगरपरिषद** | |
| १ | कागल शहरातील विविध ठिकाणी डांबरी रस्ते, कॉंक्रीट रस्ते तसेच रस्ते पॅचवर्क करणे. | २.०० |
| २ | कागल नगरपरिषद हदिदतील पाझर तलाव येथे सोलर लाईट व नेट मिटरिंग व इतर अनुषगिक कामे करणे. | २.५० |
| ३ | कागल नगरपरिषद हदिदतील पाझर तलाव ते हुच्चे मळा रस्ता डांबरीकरण करणे. | ०.५० |
| ४ | स्वराज्य पार्क येथे गटर बांधकाम करणे. | ०.२० |
| ५ | कागल शहरात विविध ठिकाणी ओपन जिम बसविणे. | ०.३० |
| ६ | कागल नगरपरिषद हदिदतील पोलिस लाईन ते गोसावी वसाहत रस्ता डांबरीकरण करणे. | ०.३० |
| ७ | कागल शहरामध्ये बॅडमिटंन कोर्ट, मॅट बसविणे व अनुषंगिक कामे करणे. | ०.१० |
| ८ | कागल शहरामध्ये स्वच्छता अनुषंगिक कामे करणे, घनकचरा व्यवस्थापन , GFC स्टार रेटिंग अनुषंगिक कामे करणे. | २.०० |
| ९ | कागल शहरामध्ये पुस्तकांची बाग विकसित करणे. | ०.१० |
| १० | कागल नगरपरिषद हदिदतील शाहु वसाहत घरकुल सर्व्हे नं २४८ पैकी जागेत गटर, रस्ता व इमारती संदर्भातील अनुषंगिक कामे करणे. | २.०० |
| | **एकुण (अ)** | **१०.००** |
| | **गडहिंग्लज नगरपरिषद** | |
| १ | गडहिंग्लज नगरपरिषद हद्दीतील घाळी कॉलनी येथील अंतर्गत रस्ते खडीकरण डांबरीकरण करणे. | ०१.०० |
| २ | गडहिंग्लज नगरपरिषद हद्दीतील म.धु.श्रेष्टी विद्यालय येथे प्रेक्षक गॅलरी करणे. | ०.७० |
| ३ | गडहिंग्लज नगरपरिषद हद्दीतील भिनगर येथे समाज मंदिर बांधकाम करणे. | ०.२० |
| ४ | गडहिंग्लज नगरपरिषद हद्दीतील रिंगरोड विकसित करणे. | १.५० |
| ५ | गडहिंग्लज नगरपरिषद हद्दीतील सि.स.नं.१२४ येथील मुख्याधिकारी निवासस्थान बांधकाम करणे. | ०.४० |
| ६ | गडहिंग्लज नगरपरिषद हद्दीतील नागडोह येथील रस्ता खडीकरण डांबरीकरण करणे. | ०.५० |
| ७ | गडहिंग्लज नगरपरिषद हद्दीतील विविध विकास कामे करणे. | ०.२० |
| ८ | गडहिंग्लज नगरपरिषद हद्दीतील, अयोध्यानगर येथील संजय सांळुखे घर ते बाळुमामा मंदिर येथील यमगेकर अपार्टमेंट रस्ता व गटर करणे. | ०.५० |
| | **एकुण (ब)** | **५.००** |
| | **एकुण (अ) व (ब)** | **१५.००** |